**महाराष्ट्र कोस्टल झोन मॅनेजमेंट ॲथॉरिटीस वाढीव १५% टक्के मर्यादेनुसार सहाय्यक अनुदान मंजूर व वितरित करणेबाबत .**

**महाराष्ट्र शासन**

**पर्यावरण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: एमसीझेडएमए २०१४/प्र.क्र.१८९/तां क-४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,.

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

तारीख: ०३ मार्च , २०१५

वाचा —

१) शासन निर्णय क्रमांकः इएनव्ही-२००९/प्र.क्र.७२/तां. क.३,दि. १२ ऑगस्ट , २००९.

२) शासन निर्णय क्रमांक: एमसीझेडएमए २०१४/प्र.क्र.१८९/तां क-४, दि. ०६ जानेवारी , २०१५

३) वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.९/०२/२०१५

**शासन निर्णय**

१) राज्याच्या तटीय क्षेत्राचे पर्यावरणदृष्टया संरक्षण व संवर्धन करण्यासाठी केंद्र शासनाच्या पर्यावरण व वन मंत्रालयाने पर्यावरण संरक्षण अधिनियम, १९८६ अंतर्गत राज्यात महाराष्ट्र किनारी व्यवस्थापन प्राधिकरणाची (M.C.Z.M.A.) ची स्थापना केलेली आहे.

२) तटीय क्षेत्रातील पर्यावरणदृष्टया संवेदनशील क्षेत्र ठरवून त्याचे व्यवस्थापन आराखडे तयार करणे, कांदळवनाचे संरक्षण करणे व एकूण तटीय क्षेत्राच्या पर्यावरणीय व्यवस्थापनाच्या समन्वयाचे काम महाराष्ट्र किनारी व्यवस्थापन प्राधिकरणा (M.C.Z.M.A.) मार्फत करण्यांत येते .

संदर्भिय क्रमांक १ येथील शासन निर्णयानुसार नमुद केलेला कार्यक्रम राबविण्यासाठी महाराष्ट्र कोस्टल झोन मॅनेजमेंट ॲथॉरिटीस एकूण अर्थसंकल्पित केलेल्या रुपये १००.०० लक्ष निधीपैकी ६० % च्या मर्यादेत म्हणजेच एकूण रु. ६०.०० लक्ष (रुपये साठ लक्ष फक्त) एवढी रक्कम मंजूर व मुक्त करण्यास संदर्भिय क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

आता वित्त विभागाने त्यांच्या संदर्भिय क्रमांक ३ येथील परिपत्रकान्वये योजनांतर्गत निधी ७५% एवढया मर्यादेत वितरित करण्यांस सहमती दिली आहे. त्यानुसार सन २०१४-१५ या वर्षासाठी एकूण अर्थसंकल्पित केलेल्या रुपये १००.०० लक्ष इतक्या निधीच्या ७५ % मर्यादेत उपलब्ध होणाऱ्या रुपये ७५ लक्ष निधीपैकी यापूर्वी वितरित केलेला रुपये ६०.०० लक्ष इतका निधी वजा जाता रुपये १५.०० लक्ष (वाढीव १५% च्या मर्यादेत) इतका वाढीव निधी उपलब्ध झाला आहे.सदर वाढीव निधी महाराष्ट्र

कोस्टल झोन मॅनेजमेंट ॲथॉरिटीस मंजूर करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देण्यांत येत आहे.

१) उपरोक्त निधी हा महाराष्ट्र कोस्टल झोन मॅनेजमेंट ॲथॅरिटीच्या नावे स्टेट बँक ऑफ इंडियामध्ये उघडण्यात आलेल्या खात्यामध्ये जमा करण्यात यावा.

२) सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करावे. योजनांतर्गत मंजूर विशिष्ट कामासाठी अदा केलेली वा मान्य केलेली रक्कम त्याच कामासाठी राज्य शासनाने घालून दिलेल्या अटी व शर्ती प्रमाणे व विहित कालमर्यादेत मान्य केलेल्या खर्चाच्या मर्यादेत खर्च करणे आवश्यक आहे. हा निधी इतर दुसऱ्या कामासाठी वापरता येणार नाही किंवा वळता करता येणार नाही.

३) महाराष्ट्र कोस्टल झोन मॅनेजमेंट ॲथॉरिटीने प्रत्येक आर्थिक वर्षाचे उपयोगिता प्रमाणपत्र वर्ष संपल्यानंतर एप्रिलच्या १५ तारखेपर्यंत पर्यावरण विभागास सादर करावे. उपयोगिता प्रमाणपत्र सादर करतेवेळी बँकेतील या खात्यावर झालेल्या व्यवहाराच्या नोंदी दर्शविणाऱ्या पासबुकची साक्षांकित प्रत सोबत जोडण्यात यावी.

४) सहाय्यक अनुदानामधून करण्यात येणाऱ्या खर्चाच्या रकमेचे लेखे प्रचलित लेखा संहितेनुसारच ठेवण्यात यावेत व त्याचे लेखापरिक्षण करण्यात यावे व त्याचा अहवाल पर्यावरण विभागास पाठविण्यात यावा.

५) राज्य शासनाने वेळोवेळी घालून दिलेल्या अटींचे व शर्तींचे पालन करणे महाराष्ट्र कोस्टल झोन मॅनेजमेंट ॲथॅरिटीवर बंधनकारक राहील.

३) सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्या मार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र कोस्टल झोन मॅनेजमेंट ॲथॉरिटीस अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री. र. ल. लखोटे, कक्ष अधिकारी , पर्यावरण विभाग व नियंत्रक अधिकारी म्हणून श्री. सो. ना. बागुल, उप सचिव यांना घोषित करण्यात येत आहे. त्यांनी " महाराष्ट्र कोस्टल झोन मॅनेजमेंट ॲथॉरिटी (Maharashtra coastal Zone Management authority)" यांच्या नावे रु.१५.०० लक्ष एवढया निधीचा धनादेश काढावा.

४) सदर खर्च मागणी क्रमांक " यू-४,३४३५-परिस्थितीकी व पर्यावरण, ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना

(०२)(१२) महाराष्ट्र किनारी क्षेत्र व्यवस्थापन प्राधिकरण (३४३५ १२९४), ३१ सहाय्यक अनुदाने " या मुख्य लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व हा खर्च सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

५) सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.९/०२/२०१५अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०३०३१२२४३९१२०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Laxmikant Lakhote

Digitally signed by Ravindra Laxmikant Lakhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=421202, st=Maharashtra, cn=Ravindra Laxmikant Lakhote
Date: 2015.03.03 12:34:38 +05'30'

(र. ल. लखोटे)
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा व हकदारी/लेखा परिक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
२. अध्यक्ष, महाराष्ट्र कोस्टल झोन मॅनेजमेंट ॲथॉरिटी तथा सचिव, पर्यावरण विभाग, मुंबई.
३. सदस्य सचिव, महाराष्ट्र कोस्टल झोन मॅनेजमेंट ॲथॉरिटी
४. मा. मंत्री (पर्यावरण) यांचे खाजगी सचिव
५. मा. राज्यमंत्री (पर्यावरण) यांचे खाजगी सचिव
६. संचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९. वित्त विभाग, व्यय-१६/अर्थसंकल्प-७, मंत्रालय, मुंबई.
१०.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.सर्व कार्यासने, पर्यावरण विभाग,
१२.निवड नस्ती, पर्यावरण विभाग, मुंबई.